प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबत.
**श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी लि., देऊळगांव, जि.बुलढाणा**

# महाराष्ट्र शासन

**सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सूतगि -३३१८/ प्र.क्र.३ /टेक्स १ (अ)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ जानेवारी , २०१९

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि ११९४/प्र.क्र.११७/टेक्स-१ , दि.७.९.१९९४.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि १२००/प्र.क्र.१५३/टेक्स-१,दि.१३.६.२०००
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि ११२०००/प्र.क्र.१२५/टेक्स-१(अ), दि.२.८.२००३.
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि ११०८/प्र.क्र.९१/टेक्स-१(अ), दि.३०.६.२०११
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सूतगि ३३१६/प्र.क्र.८१/टेक्स-१ (अ),दि.१०.७.२०१७
६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.धोरण २०१७/प्र.क्र.६/टेक्स-५, दि.१५.२.२०१८
७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सूतगि ३३१८/प्र.क्र.३/टेक्स-१(अ),दि.६.३.२०१८
८) संचालक, वस्त्रोद्योग,नागपूर यांचे पत्र क्र.६(१)/सूतगि/२६२४/१८, दि.१३.०३.२०१८
९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि १२००/११७१३/प्र.क्र.४२६/टेक्स-१(अ), दि.२८.३.२०१८
१०) शासन पत्र, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि ३३१८/प्र.क्र.३/टेक्स-१(अ), दि.२९.०९.२०१८
११) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि ३३१८/प्र.क्र.३/टेक्स-१(अ),दि.२१.१२.२०१८

प्रस्तावना :-

श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी लि., देऊळगांव, जि.बुलढाणा या आठव्या पंचवार्षिक योजना काळातील सर्वसाधारण प्रवर्गातील सूतगिरणीची दि.०६.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये नव्याने शासन अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली आहे. शासनाने दिनांक ३०.६.२०११ च्या शासन निर्णयान्वये, राज्यातील सहकारी सूत गिरण्यांच्या सुधारीत प्रकल्प अहवालाची किंमत रु.६१७४.२४ लाख इतकी निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार या सुतगिरणीने महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई यांचेकडून २५२०० चात्यांचा सुधारीत प्रकल्प अहवाल तयार करुन संचालक वस्त्रोद्योग यांचे मार्फत शासनाच्या मंजूरीसाठी सादर केलेला आहे. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ८ येथील दि.१३.३.२०१८ च्या पत्रान्वये प्रकल्प अहवाल सुकाणू समितीच्या मंजूरीसाठी सादर केला. सुकाणू समितीच्या दिनांक १०.०९.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी लि., देऊळगांव, जि.बुलढाणा या सूतगिरणीच्या प्रकल्प अहवालात दर्शविलेल्या किंमतीबाबत चर्चा करुन अर्थसहाय्यासाठी

घेण्यात आलेल्या सदर सूतगिरणीच्या प्रकल्प अहवालाची एकूण रु.६१७४.२४ लाख किंमत समितीने मान्य केली. ही किंमत शासनाने दि.३०.६.२०११ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या मॉडेल प्रकल्प अहवालातील किंमतीच्या मर्यादेत असल्याने, श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी लि., देऊळगांव, जि.बुलढाणा या सूत गिरणीच्या रु.६१७४.२४ लाख एवढ्या प्रकल्प किंमतीस मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, दि. ६.३.२०१८ अन्वये श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी लि., देऊळगांव, जि.बुलढाणा या सहकारी सुतगिरणीची शासन अर्थसहाय्यासाठी नव्याने निवड आली आहे. या सूतगिरणीची प्रथमच प्रकल्प अहवाल किंमत निश्चित करण्यात येत असल्याने शासन निर्णय दि.३०.६.२०११ अन्वये निश्चित केलेल्या रु.६१७४.२४ लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीच्या मर्यादेत या सूत गिरणीच्या २५२०० चात्यांच्या प्रकल्पास, त्या त्या बाबींसाठी परिच्छेद -२ मधील तक्त्याप्रमाणे मंजूर कमाल मर्यादेपेक्षा जास्त होणारा खर्च गिरणी स्वनिधी उभारुन करेल या अटीवर सदर सूतगिरणीच्या रु.६१७४.२४ लाख इतक्या प्रकल्प किंमतीस खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

१) सूतगिरणीच्या कामासाठी कालबध्द कार्यक्रम (Time bound Program) आखून घ्यावा व त्यानुसार सूतगिरणीची उभारणी विहित कालावधीत करावी.

२) शासन निर्णय दि.२४.३.१९९९ मधील सूतगिरणी परतफेडीस पात्र होण्याबाबतच्या अटीमध्ये दि.१०.०७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून सदरची सुधारणा या सूतगिरणीसाठी बंधनकारक राहील.

३) सूतगिरणीस निधी उभा करण्यासाठी कोणती बँक कर्ज देणार आहे, त्या बँकेचे कर्ज मंजूर करण्यात येत असल्याबाबतचे पत्र सादर करावे.

४) सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतचा तिमाही प्रगती अहवाल संचालक वस्त्रोद्योग यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

५) सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहील याबाबत सूतगिरणीने तसेच संचालक वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

६) सदर सूतगिरणी सर्वसाधारण प्रवर्गातील असल्याने शासनाने भविष्यात काही अटी / शर्ती घातल्यास त्या या सूतगिरणीवर बंधनकारक असतील.

२. श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी लि., देऊळगांव, जि.बुलढाणा ही सूतगिरणी आठव्या पंचवार्षिक योजनेच्या काळातील असल्याने शासन निर्णय, दि. २१.१२.२०१८ अन्वये सूतगिरणीच्या प्रकल्पाच्या ५:४५:५० (अनुक्रमे सभासद भागभांडवल, शासकीय भागभांडवल व वित्तीय संस्था कर्ज) या वित्तीय आकृतिबंधास मंजूरी

देण्यात आली आहे. सूतगिरणीचे सभासद भाग भांडवल व शासकीय भाग भांडवल याचे प्रमाण १:९ असे राहील. त्यानुसार सूतगिरणीने पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करावयाचा आहे.

(रुपये लाखात)

| | | |
|---|---|---|
| अ) | सभासद भाग भांडवल (५%) | रु.३०८.७१ |
| ब) | शासकीय भागभांडवल (४५%) | रु.२७७८.४१ |
| क) | दीर्घ मुदती कर्ज (५०%) | रु.३०८७.१२ |
| | **एकूण** | **रु.६१७४.२४** |

सदर सूतगिरणीचा प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तरतूदीचा तपशील खालीलप्रमाणे राहील व त्या मर्यादेत गिरणीने खर्च करणे गिरणीस बंधनकारक राहील.

(रुपये लाखात )

| अ.क्र. | तपशिल | प्रकल्प अहवालानुसार मंजूर खर्च |
|---|---|---|
| १ | जमीन व जमीन विकास | ५८.०६ |
| २ | फॅक्टरी व इतर बांधकाम | १२१५.३० |
| ३ | प्लँट ॲन्ड मशिनरी | ३१०२.७८ |
| ४ | इतर कायम मालमत्ता | ८४५.०० |
| ५ | स्टोअर्स ॲन्ड स्पेअर्स | ६१.०० |
| ६ | प्रिऑपरेटीव्ह खर्च | २०८.१६ |
| ७ | कॉन्टीजन्सी | २७३.७७ |
| ८ | मार्जीन मनी | ४१०.१७ |
| | **एकूण** | **६१७४.२४** |

३. सूतगिरणीने रु.६१७४.२४ लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी. शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम निधीच्या उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल. प्रकल्प पूर्ण करण्यासाठी वरीलप्रमाणे त्या त्या प्रयोजनासाठी मंजूर किंमतीपेक्षा जास्त रक्कम खर्च झाल्यास सदरची जास्तीची रक्कम सूत गिरणीने स्वबळावर स्वनिधीतून उभी करणे आवश्यक राहील. प्रकल्पावर अतिरिक्त होणारा खर्च सूत गिरणीला स्वत: करावा लागेल. तसेच यंत्रसामुग्री खरेदी व स्थापत्य बांधकामासाठी शासन निर्णय दि.१५.६.२००६ व दि.२८.३.२०१८ नुसार

मान्यता घ्यावी. गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२४१२४८४१५४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-op Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2019.01.24 12:56:21 +05'30'

**( विशाल मदने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. जिल्हाधिकारी, बुलढाणा
७. प्रादेशिक उप संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर
८. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, बुलढाणा
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई
१०. कार्यासन अधिकारी १६-सी / अवर सचिव, १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रतीत)
१२. अध्यक्ष, श्री. बालाजी सहकारी सूतगिरणी लि., देऊळगांव, जि.बुलढाणा (संचालक, वस्त्रोद्योग यांचेमार्फत)
१३. निवडनस्ती (टेक्स-१(अ) / टेक्स-१ ब).